GR-200410081158180001-1201

महात्मा ज्योतिबा फुले जलभूमि अभियानातर्गत पाटबंधारे संबंधीची, पाझर तलाव, गांव तलाव यांतील गाळ काढणे, को. प. बं./ पाझर तलाव दुरुस्ती, इत्यादि कामे करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

ग्रामविकास व जलसंधारण विभाग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

परिपत्रक :- संकीर्ण २००१/ प्र.क्र. २७/ ०१ जल १, दिनांक २० जून, २००२

पहावे:- १) शा. नि. क्र. जलसं- २००२/ प्र.क्र. ५८१/ जल ७, दिनांक २८. २. २००२

**परिपत्रक**

*महात्मा ज्योतिबा फुले जलभूमि अभियान* हा कार्यक्रम दोन वर्षासाठी संदर्भ क्र. १ अन्वये राबविण्याचा शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. सदर कार्यक्रम १ मे, २००२ पासून कार्यान्वित करण्यात आलेला आहे.

२. या कार्यक्रमांतर्गत पारंपारिक जलस्रोत्र संवर्धनासाठी तलावातील गाळ काढणे व डागडुजी करणे, पाझर तलावाची विशेष दुरुस्ती व बळकटी करणे आणि विविध लघु पाटबंधारे प्रकल्पांमध्ये पाणी वापर संस्था स्थापन करून पाण्याचे व्यवस्थापन संबंधीत संस्थांकडे हस्तांतरित करणे, तसेच पाणी - टंचाईग्रस्त गांवांच्या वरील भागातील सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर गांवतळी व वळण बंधारे, इत्यादि योजना राबविण्याचा समावेश आहे.

३. या कार्यक्रमास मे महिन्यात सुरूवात होऊन देखील अद्यापपर्यंत लघु पाटबंधारे संबंधीची कामे कार्यान्वित करण्यास योग्य ती गती प्राप्त झालेली नाही. सदर अभियानांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजना विहित कालमर्यादेत पूर्ण करून त्यापासून लाभ मिळणे आवश्यक आहे, त्यानुसार कार्यक्रम राबविण्यामागचा हेतू सफल होईल.

४. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, कामाची अंदाजपत्रके तयार करून त्यास तांत्रिक मान्यता प्रदान करणे व त्याची अंमलबजावणी करणे यास विलंब होत आहे. त्यामुळे शासन निर्णयातील परिरक्षण परिच्छेदात स्पष्ट केल्यानुसार कामाची अंदाजपत्रके तयार करून त्यास सक्षम स्तरावर प्रशासनीक/तांत्रिक मान्यता घेणे व कामाची अंमलबजावणी विहित वेळेत होईल, असे संबंधीत अभियंता यांनी पहावे.

५. शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे वरील कामांना प्रशासकीय मंजुरी त्या त्या यंत्रणेने द्यावयाची आहे. त्यानुसार योजनेतील लघु पाटबंधारे योजनेच्या कामांना सक्षम अधिकाऱ्यांनी मान्यता देऊन कामाची अंमलबजावणी तात्काळ होईल याची काळजी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( बी. एम्. केंद्रेकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे उपसचिव,
मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव ( सर्व ),
मा. मुख्य सचिव,
मा. अध्यक्ष, जलसंधारण सल्लागार परिषद यांचे खाजगी सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
जिल्हाधिकारी ( सर्व जिल्हे ),
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ),
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर ), पुणे,
अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर ) मंडळ, (सर्व ),
निवडनस्ती जल १ कार्यासन